# मृत आई भेटून गेली

**डार्विनचा उत्क्रांतिवादी सिद्धांत खरा आहे काय ? भाग ४**

**E Book 169**


प्राचार्य अद्वयानंद गळतगे,

भोज ५९१२६३, जि. बेळगाव, (कर्नाटक)  भ्रमणध्वनी- ९०२००२५८५


## <u>मृत आई भेटून गेली</u>

संध्याकाळचे साडेसात वाजले होते. दिवसभराच्या कामानंतर विश्रांती म्हणून मी माडी वरील खाटेवर आडवा झालो होतो. थोड्या या वेळाने माझा डोळा लागला. तथापि त्या अवस्थेतही माझ्या शेजारी पत्नी येऊन बसल्याची मला स्पष्ट चाहूल लागली. काही वेळाने ती उठून गेली. पण पत्नी अशी संध्याकाळच्या वेळी कधी माडीवर येत नाही. माझ्या खाटेवर माझ्याजवळ तिने असे बसून जाण्याचे तर काहीच कारण नाही. हा विचार माझ्या मनात नंतर आला व म्हणून मी खाली जाऊन तिला वर कशासाठी आलीस व माझ्याजवळ बसून गेलीस? असे विचारले. तेव्हा ती म्हणाली ‘ मी कधी वर आले? येथेच स्वयंपाक करते आहे मी बुचकळ्यात पडलो. पण नंतर डोक्यात प्रकाश पडला. मृत [illegible] भेटून गेली याची खात्री झाली. ती खात्री मला कशामुळे झाली? त्याच्या पाठीमागे मोठा इतिहास आहे तो सांगितला पाहिजे.



सौ. गळतगे

माझी एकुलती एक मुलगी माझ्या बहिणीच्या मुलाला( भाच्याला) दिलेली आहे. पण बहीण खाष्ट सासू बनली होती. आपली भाची असूनही तिला चांगली वागणूक देत नव्हती. तिचा ती जाच करीत असे. **मुलगा आईच्या कह्यातला. त्याचे काही चालत नसे. त्यांना एक मुलगा झाला होता. एक वर्षाचा मुलगा आजारी पडला पण त्याच्याकडे त्यांनी पूर्ण दुर्लक्ष केले. मुलं मृत्युपंथाला लागल्याचा मुली कडून निरोप येतात मी स्वतः तिच्या सासरी जाऊन मुलीला मुलासह घरी  घेऊनआलो. मुलाला बालरोग तज्ञ डॉक्टरला दाखवून पाच सहा महिन्यात पूर्ण बरे केले. मुलीला परत सासरी पाठवायचे नाही असा  माझा निर्धार झाला. पण माझ्या आईला ही गोष्ट पसंत नव्हती. तिचा आपल्या मुलीकडे जास्त  ओढा होता. नातीपेक्षा आपली लेक तिची जास्त आवडती होती. मुलीला सासरी पाठविण्याचा तिने सारखा लकडा लावला. पण एक वर्ष झाले तरी आम्ही त्या गोष्टीला तयार झालो नाही. त्यानंतर आई आजारी पडली व काही महिन्यातच निवर्तली. पिंड ठेवण्याच्या कार्यक्रमाला माझी बहीण आली होती. पण पिंडाला कावळे शिवेनात. बराच वेळ वाट पाहिली. बरेच कावळे जमले होते. पण एकही कावळा पिंडा जवळ येत नव्हता. शेवटी तिची इच्छा मी ओळखली, व ‘तुझ्या नातीला सासरी पाठवतो, जेव’ असे म्हणून मी  पिंडाजवळ जाऊन तिच्या पाया पडलो.आणि आश्चर्य घडले. एकदम कावळे पिंडावर तुटून पडले!**

**त्यानंतर बरेच महिने गेले. पण मुलीला आम्ही सासरी पाठवले नाही. एके दिवशी स्वप्नात माडीवरच्या माझ्या खाटे शेजारी आई येऊन बसलेली दिसली. मेलेली व्यक्ती स्वप्नात येणे स्वाभाविक आहे असे वाटून मी त्या स्वप्नांकडे दुर्लक्ष केले. पण मी दिलेल्या वचनाची आठवण करून देण्यासाठी ती स्वप्नात आली होती, हे नंतर स्पष्ट झाले. कारण आणखी काही महिने गेले आणि वर उल्लेख केलेली (माडीवरच्या खाटेवर माझ्या शेजारी ती येऊन बसल्याची)  घटना घडली. स्वप्नात येऊन तिने दिलेला संदेश मला समजला नाही किंवा समजला असला तरी आम्ही तिला वचन दिल्याप्रमाणे तिच्या नातिला सासरी पाठवली नाही, म्हणून प्रत्यक्ष सदेहच भेटून तिने अशारितीने दुसऱ्यांदा संदेश दिला होता! नंतर थोड्याच दिवसात भाच्याला ताकीद करून मुलीला आम्ही तिच्या सासरी पाठवले. त्यानंतर मात्र आई माझ्या स्वप्नात सुद्धा कधी आली नाही.**

## पिंडदानातील रहस्य

वरील घटनेचा अनुभव काय सांगतो? मनुष्य मेल्यानंतर संपत नाही; आत्म्याच्या स्वरूपात अस्तित्वात असतो, हे तर ही घटना सिद्ध करतेच. पण मेल्यानंतर माणसाच्या( मृतात्म्याच्या) काही इच्छा असतात व त्या मागच्या संबंधित लोकांना पूर्ण कराव्या लागतात. त्या जेव्हा तीव्र स्वरूपाच्या असतात तेव्हा तो आत्मा त्यासाठी भौतिक शरीर सुद्धा धारण करून भेटू शकतो, हेही या घटनेवरून सिद्ध होते. मृत आईने स्वतःचे भौतिक शरीर निर्माण केल्यामुळे, As God creates, so man can create म्हणजे ईश्वर ज्याप्रमाणे( भौतिक वस्तू, उदा. विश्व) निर्माण करतो, त्याप्रमाणे मनुष्यही ( भौतिक वस्तू, उदा. शरीर) निर्माण करू शकतो, हे मॅडम ब्लॅव्हेट्रस्की यांचे विधान, मला भेटण्यासाठी शरीर धारण करून आलेल्या आईचा माझा अनुभव, सत्य असल्याचे सिद्ध करतो. पण सर्वात महत्त्वाचा अनुभव म्हणजे पिंडदान करण्याच्या प्रथेतून व्यक्त होणारी मृताची इच्छा कळणे, हा होय. मृताची इच्छा काय आहे हे, कावळ्यांनी पिंडाचे अन्नग्रहण करणे वा न करणे, यावरून कळते, ही गोष्ट या घटनेने सिद्ध होते. आता प्रश्न असा की मृताची इच्छा काय आहे हे पिंड ग्रहण करणाऱ्या कावळ्यांना कशी कळते? या प्रश्नाचे उत्तर केवळ ब्रह्मविज्ञानचे देऊ शकते. ते उत्तर म्हणजे मृताचा व कावळ्यांचा आत्मा एकच आहे, हे होय. कारण आत्मा सर्वगत (सर्वव्यापी) आहे, हा ब्रह्मविज्ञानाचा सिद्धांत आहे. येथे मुख्य प्रश्न असा आहे की, 'तुझ्या नातीला सासरी पाठवतो' हे माझे म्हणणे कावळ्यांना कसे कळले? कारण ते वाक्य उच्चारण्यापूर्वी अन्न (पिंड) ठेवून बराच वेळ झाला तरी पिंडाला न शिवणारे तेथे जमलेले सर्व कावळे, ते वाक्य उच्चारताच एकदम पिंडावर तुटून पडले, हे कसे? त्या कावळ्यांना माझी भाषा कळली तरी हेच असे उत्तर नाही. तसेच मृताची इच्छा काय आहे, ती पूर्ण करण्याचे वचन देणारे कोण आहे व ते काय



**बोलले, हे कावळ्यांना कळले हेही त्याचे खरे उत्तर नाही. कारण आईच्या नातीला तिच्या सासरी पाठवण्याशी काही संबंध नाही. त्या वचनामुळे कावळ्यांचे समाधान होण्याचेही काही कारण नाही. तेथे जमलेल्या सर्व कावळ्यांच्या रूपाने माझी आईच तेथे उपस्थित होती असे समजल्या खेरीज या घटनेचा उलगडा होत नाही. मी तिला वचन दिल्यानंतर तिचे समाधान झाले. ती सर्व कावळ्यांच्या मुखांनी जेवली, हेच या प्रश्नाचे खरे उत्तर आहे. आणि तेच ब्रह्मवैज्ञानिक उत्तर आहे. कारण ब्रम्हविज्ञानानुसार, सर्वं खल्विदं ब्रह्म। अयं आत्मा ब्रम्ह। म्हणजे 'हे सर्व (जग व कावळे) खरोखरच ब्रह्म आहे. हा आत्मा( आईचा) ब्रह्म आहे' म्हणजेच सर्व कावळे व आईचा आत्मा ब्रम्ह असल्यामुळे, म्हणजेच सर्व कावळे मृत्त आईच्या असण्याहून भिन्न वा वेगळे नसल्यामुळे, सर्व कावळे जेवले, म्हणजेच मृतआईचा जीवात्माच जेवला, ब्रम्हवैज्ञानिक सत्य हे प्रकरण उघड करते. अशा रीतीने ब्रम्हवैज्ञानिक सत्य उघड करणारे प्रसंग इतरत्रही घडतात.**



**उदा.- बहेणाबाईच्या गाईला मंबाजीने सोट्याने मारले, त्याचे वळ बहेणाबाईचे गुरु तुकाराम यांच्या पाठीवर उठले! तेव्हा तुकारामांनी, 'तुझा माझा एक। आत्मा सर्वगत। ते साक्षी निश्चित। आली मज।।' (आत्मा सर्वगत असल्यामुळे गायीचा व आपला आत्मा एकच असून त्याची साक्ष गाईला मारलेल्या सोट्याचे वळ आपल्या अंगावर उठल्यामुळे मला आली ) या शब्दात तेच ब्रह्मवैज्ञानिक सत्य तुकारामांनी सांगितले आहे.( बहेणाबाईचा गाथा- सौ. शालिनी जावडेकर, अभंग क्र.५२. १८)**

**मनुष्य मेला म्हणजे त्याचे शरीर नष्ट झाले. पण व्यक्ती** (individual) **म्हणून मनुष्य नष्ट होत नाही. तो आत्म स्वरूपात अस्तित्वात असतो व त्याचे आत्म्याचे व्यक्तिगत मन मागच्या कुटुंबातील आपल्या लोकांमध्ये मायेमुळे ( इच्छेमुळे) गुंतलेले असते, ही गोष्ट या घटनेवरून स्पष्ट होते. याला मायापाश (इच्छापाश) किंवा कर्मबंध**

म्हणतात. हा मायारूपी(इच्छारुपी) कर्म बंधच माणसाच्या पुनर्जन्माला कारणीभूत होतो. मात्र कोणती घटना कोणत्या कर्मामुळे घडते हे माहित होत नाही.( याला कारणही पुनर्जन्मच. पुनर्जन्म यामुळेच पूर्वीच्या जन्मातील घटनांच्या स्मृती नाहीशा होतात. आणि ही गोष्ट उपकारकच ठरते. मागच्या जन्माच्या आठवणीमुळे अनावस्था प्रसंग निर्माण होत असल्याची उदाहरणे आढळून आली आहेत.) तथापि कर्म बलवत्तर व तीव्र स्वरूपाचे असेल तर एकाच जन्मात सुद्धा त्याचे फळ भोगावे लागल्याची घटना घडू शकते अशा घटनांची अनुभवावर आधारलेली काही उदाहरणे आता येथे देतो.

<u>कर्म सिद्धांताच्या सत्यतेचे काही अनुभव</u>

येथे कर्मसिद्धांता विषयीचे अनुभवाचे दाखले द्यावयाचे आहेत, ते माझे स्वतःच्या अनुभवाचे दाखले नसून इतरांच्या अनुभवांचे आहेत.तथापि माझा त्यांच्याशी४  एकतर घनिष्ठ संबंध आला किंवा त्यांचा अनुभव मी जवळून पाहिला. दोन अनुभव तर माझ्या वडिलांशी संबंधितच आहे. हे अनुभव माझ्या स्वतःच्या अनुभवाप्रमाणे कालक्रमानुसार सांगण्याऐवजी ते इतरांचे असल्यामुळे विषयानुक्रमाने येथे सांगत आहे. <u>अनुभव पहिला</u>: माझा थोरला मुलगा चि. वेदांत प्राथमिक शाळेत दुसरीच्या वर्गात शिकत होता हा वर्ग जाधव नावाच्या शिक्षकांकडे शिकवण्यास देण्यात आला होता. हा शिक्षक कधीकधी दारू पिऊन शाळेला जात असे व मुलांना लाथेने मारत असे. दुसरीच्या वर्गात माझा मुलगा गेल्यानंतर तो माझ्या मुलालाही लाथेने मारू लागला. त्यामुळे माझा मुलगा शाळेला जाईनासा झाला. तेव्हा मी त्या शिक्षकाला माझ्या मुलाला न  मारण्याविषयी सक्त ताकीद वजा निरोप पाठवला. तेव्हापासून माझ्या मुलाला त्याने मारणे बंद केले. पण इतर मुलांना मारणे चालूच ठेवले. हा शिक्षक आमच्या गावचा होता व गावातील शाळेतूनच निवृत्त झाला. निवृत्तीनंतर थोड्याच दिवसात त्याच्या पायाला जखम होऊन ती चिघळली व तो पाय सडला. आश्चर्य म्हणजे तो ज्या पायाने मुलांना लाथेने मारत होता,  तोच पाय सडला होता! शेवटी त्यातच त्याचा मृत्यू झाला. कर्म अतिशय वाईट व तीव्र स्वरूपाचे असल्यामुळे त्या शिक्षकाला त्याच जन्मात व तात्काळ त्याचे फळ भोगावे लागले. असा या प्रकरणात निष्कर्ष काढावा लागतो.

येथे अशी  एक शंका कोणी घेईल मागच्या कोणत्यातरी जन्मात केलेल्या वाईट कर्मामुळे त्याच्या पायाला जखम होऊन तो सडला असावा व त्यातच त्याचा मृत्यू झाला

असावा. या जन्मात मुलांना लाथेने मारणे हे त्याच्यासाठीचे केवळ एक निमित्त ठरले असावे. पण ही शंका अज्ञात कारणाच्या आधारावर घेतली गेली असल्याकारणाने ज्ञात कारणमीमांसेच्या पुढे फिकी ठरते. तो शिक्षक दारू पिऊन ज्या पायाने निरागस मुलांना लाथेने मारत होता, तोच पाय जखम होऊन सडणे व त्यातच त्याचा मृत्यू होणे ही कारणमीमांसा असून ती सोडून अज्ञात कारणमीमांसेला शरण जाणे केव्हाही गैरच, अयोग्यच. जेव्हा एखाद्या घटनेचे कारण ज्ञात होत नाही किंवा ज्ञात होऊच शकत नाही, तेव्हा कर्मसिद्धांतानुसार अज्ञात कारणाला शरण जाणे समर्थनीय ठरते. येथे मात्र ज्या पायाने त्याने मुलांना लाथेने मारलेले तोच पाय सडणे हे त्याच्या कर्मफळ भोगण्यासाठीचे आवश्यक व पुरेसे कारण ठरते.  येथे हे वाईट तीव्र स्वरूपाचे कर्म कशाला म्हणावे, ज्यामुळे ते करणाऱ्याला तात्काळ भोगावे लागते असा एक प्रश्न उपस्थित केला जाऊ शकतो. ह्या प्रश्नाचे उत्तर देणे कठीण आहे. कारण बरीच करणे उपरोल्लेखित कर्मापेक्षा तीव्र वाईट स्वरूपाची असूनही ती करणाऱ्यांना त्यांची तात्काळ किंवा त्याच जन्मात फळे भोगावी लागल्याचे आढळून येत नाही. उदा. कोवळ्या वयाच्या ५  मुलींवर अत्याचार करून त्यांची हत्या करणारे लिंगपिसाट किंवा भिन्न धर्मीय आहे म्हणून निष्पाप लोकांच्या समुदायावर बेछूट गोळीबार करून किंवा बॉम्ब टाकून त्यांची हत्या करणारे धर्मांध किंवा लाखो लोकांची सामूहिक हत्या करणारे हिटलर, स्टालीन, माओ,  पोल पॉट  सारखे राजकीय सत्तांध, अशा लोकांची कर्मे भयंकर तीव्र व वाईट स्वरूपाची असूनही त्यांना तात्काळ किंवा त्यात जन्मात फळे भोगावे लागल्याचे दिसून येत नाही. त्यांच्या वाईट स्वरूपाच्या कर्मांच्या तुलनेत मुलांना लाथेने मारणे ते मामुली कर्म वाटेल! कदाचित अशा लोकांची करणे भयंकर वाईट स्वरूपाची असल्यामुळे त्यांना तात्काळ भोगावे लागले नसावे! कारण ते तात्काळ भोगून संपल्यासारखे नाही! या जन्मात वाईट कर्म करणारे काही अनैतिक लोक  सुखात लोळत असल्याचे दिसतात, याचे कारण मागच्या जन्मात यांनी काही चांगली कर्मे केलेली असली पाहिजेत. त्याखेरीज त्यांच्या या जन्मातील सुखाची उपपत्ती जशी देता येत नाही, त्याचप्रमाणे या जन्मात भयंकर वाईट कर्मे करणाऱ्यांना एका जन्मात नव्हे पुढील अनेक जन्मात त्याची फळे निश्चितच भोगावी लागणार, असेच उत्तर त्यांच्या या

जन्मातील भयंकर वाईट कर्माच्या फळाच्या उपपत्तीसाठी जावे लागते.( यांना ‘संचित कर्म’ ही संज्ञा दिलेली आहे.)

<u>अनुभव दुसरा:</u> माझे आजोळ भिवशी या गावापासून पूर्वेस तीन किलोमीटर अंतरावर वेदगंगेच्या पलीकडच्या काठावर जत्राट हे गाव असून तेथील माझे काका( मावशीचा नवरा) कृष्णा पाटील यांनी आपल्या संयुक्त कुटुंबातील दोन्ही सुना व एकदा आपले २०० रुपये चोरल्याचा आरोप केला. ( ही १९५२ सालची घटना आहे.) दोन्ही सुना शपथेवर आपण निर्दोष असल्याचे सांगू लागल्या पण काका आत्या शपथेवर खोटे बोलत आहेत असे म्हणू लागले. हे प्रकरण शेवटी विकोपाला गेले व त्याचा सोक्षमोक्ष लावण्यासाठी दोन्ही सुनांनी विशाळगडला जाण्याचा आग्रह धरला. तेथील दर्ग्यात दोषी लोकांना[1] बेड्या घालून दर्जातील पिराभोवती पाच फेऱ्या काढावयास सांगतात. व्यक्ती निर्दोष असेल तर बेडी आपोआप निखळते व नसेल तर निखळत नाही अशी श्रद्धा आहे. काका सुनांवर आपला आरोप मागे घ्यायला तयार नसल्यामुळे सुनांनी आग्रह धरल्याप्रमाणे शेवटी विशाळगडला जावयास काका तयार झाले.




तेथे गेल्यानंतर दोन्ही सुनांनी आपल्या सासऱ्याला ही बेडी घालण्याचा आग्रह धरला. त्यानुसार दोन्ही सुना व सासरा या तिघांना बेड्या घालण्यात आल्या. पहिल्या दोन फेऱ्यातच दोन्ही सुनांच्या बेड्या निखळल्या पण त्यांच्या सासऱ्यांची बेडी पाच फेऱ्या काढल्या तरी निखळल्या नाहीत*




[1] या प्रकरणातही धर्माच्या फलनिष्पत्ती बाबत मागच्या प्रकरणाप्रमाणे शंका उपस्थित केली जाऊ शकते. त्या शंकेला मागच्या प्रकरणात दिलेले उत्तर लागू होते.

तेव्हा  काकानी,  ‘देवही माझ्यावर उलटला’ असे म्हणून ‘देवा’वरही खोटेपणाचा आरोप केला. या घटनेनंतर दोनच वर्षात त्यांना घशाचा कॅन्सर होऊन काही महिन्यातच त्यांचा मृत्यू झाला. कायिक नसले तरी मानसिक व वाचिक तीव्र स्वरूपाचे हे वाईट कर्म असल्यामुळे त्याचे फळ काकांना तात्काळ घशाच्या कॅन्सरच्या रुपाने भोगावे लागले असेच म्हणावे लागते.

<u>अनुभव तिसरा:</u>  हा अनुभव माझ्या वडिलांच्या बाबतीत असून हे प्रकरण माझ्या जन्म होण्यापूर्वी घडलेले आहे.( विशेषतःआईकडून, कारण माझा जन्म वडिलांच्या लग्नानंतर वीस वर्षांनी झाला आहे)  त्यांच्याकडून(विशेषतःआईकडून, कारण वडील स्वतब्रद्दल फारसे काही सांगत नसत.) हे प्रकरण ऐकून मला माहित झाले आहे. शिवाय हे प्रकरण गावातही प्रसिद्ध असल्याचे तिने सांगितले. या अनुभवाचे प्रकरण सांगण्यापूर्वी माझ्या वडिलांची माहिती प्रथम सांगितली पाहिजे. माझे वडील अत्यंत सात्विक प्रवृत्तीचे सच्छिल होते. त्यांचा व्यवहार साधू सारखा होता( लग्नापूर्वी ते संन्यास घेण्यासाठी रामदास स्वामी प्रमाणे घरातून पळून गेले होते. पण आईने- माझ्या आजीने- त्यांना परत आणले होते) भोज गावातच नव्हे तर पंचक्रोशीत वेदांती पुराणिक म्हणून प्रसिद्ध होते. तंबोऱ्यावर ते पुराण सांगत असत. त्यांच्याविषयी गावातील सर्व लोकांना अतिशय आदर होता. अशा या व्यक्तीला शंकर घाटगे नावाच्या शेजारच्या माणसाने एकदा परसाच्या जागेसाठी भांडण काढून मारले. वडिलांनी त्याला प्रतिकार केला नाही या घटनेनंतर थोड्याच दिवसात त्या माणसावर अशी परिस्थिती आली की जमीन व घर विकून त्याला गाव सोडून जावे लागले व परगावातही त्याने थोड्याच दिवसात गळफास लावून आत्महत्या केली. एका साधू सारख्या माणसाला जागेसाठी अन्यायाने मारल्याचे हे फळ त्याला भोगावे लागले असेच म्हणावे लागते. कारण अशीच बेडी आपोआप निखळणे  हा श्रद्धेचा प्रश्न नाही व चमत्कारही नाही.  ही एक अतींद्रीय पातळीवरील सामान्य घटना आहे. मात्र ती घडण्यासाठी अतींद्रिय शक्ती प्राप्त माध्यमाची आवश्यकता आहे. उदा. आमच्या भोज गावी रावसाहेब उप्पार नावाची एक अतिंद्रिय शक्ती प्राप्त व्यक्ती असून त्याच्याकडे निवडणुकीत आपण निवडून येऊ काय, आपले अमुक काम होईल काय, अशा प्रकारचे विविध प्रश्न विचारणारे लोक येतात. त्यांच्या प्रश्नांचे बरोबर उत्तर देण्याचे एक साधन त्यांच्याकडे आहे. ते साधन म्हणजे एक फूट

लांब चार इंच रुंद अशा पाच कापडाच्या पट्ट्या असून त्यांचे काठ दुमडून शिवलेले आहेत. त्या शिवलेल्या काठांच्या पट्ट्यांच्या पोकळीत तेवढ्याच लांबीच्या पाच काड्या प्रत्येकी एक या प्रमाणे, बाजूच्या भोकातून तो घालतो व पाचही पट्ट्या गुंडाळून जमिनीवर ठेवतो, व थोड्या वेळाने त्या उलगडतो. निवडून येणार असेल किंवा काम होणार असेल तर तीन किंवा पाचही काड्या आपोआप बाहेर आलेल्या आढळतात. एक किंवा चार काड्या बाहेर आल्या असतील तर काम होत नाही. दोन आल्या तर अर्धवट काम होते. प्रस्तुत लेखकाने या गोष्टीचा अनेकदा पडताळा पाहिला आहे. हेच अतींद्रिय कार्य दर्ग्यातील पिराच्या समाधी माध्यमातून होते. घटना माझ्या जन्मानंतरही घडली आहे. ती आता सांगतो.

अनुभव चौथा: हे प्रकरण घडले त्यावेळी मी प्राथमिक शाळेत शिक्षण घेत होतो. आमच्या घरच्या पूर्वेला एक बोळ आहे.( होता म्हटले पाहिजे.  कारण आम्ही ते घर विकले आहे.) त्या बाजूची भिंत अतिक्रमण करणारी आहे, ती पाड, असे म्हणून आमच्या शेजारच्या भाऊबंदातील एका माणसाने माझ्या वडिलांना असभ्य (न लिहिता येणारी) शिवी देऊन मारले. वडिलांनी कसलाही प्रतिकार न करता व उलट काही न बोलता त्याचा मार खाल्ला. या घटनेनंतर काही वर्षातच ही वडिलांना मारणारी व्यक्ती अगदी तरुण वयात घशाचा कर्करोग होऊन  मेली. ही व्यक्ती दुसरी तिसरी कोणी नसून यापूर्वी सांगितलेल्या प्रकरणातील, आमच्या घरातील ज्वारीचा डबा चोरणाऱ्या बाईचा नवरा व माझा टेबलाच्या खणातून पैसे चोरणाऱ्या मुलाचा बाप होय! (अर्थात डबा व पैसे चोरण्याची घटना ही व्यक्ती मेल्यानंतर बऱ्याच वर्षांनी घडली आहे) कोणतेही कर्म कायिक असले तरी त्याचा उगम मानसिक असतो. माझ्या वडिलांना मारण्याची वरील दोन्ही प्रकरणातील माणसांची कर्मे बाह्यतःकायिक व वाचिक असली तरी  त्यांचा उगम मानसिकच म्हणजे अध्यात्मिक असून ती तीव्र वाईट म्हणजे अन्यायकारक असल्यामुळे त्याची फळे त्याच जन्मात- नव्हे तात्काळ- ती कर्मे करणाऱ्यांना भोगावी लागली, असेच म्हणावे लागते.  अर्थात पूर्वजन्मातील तीव्र वाईट स्वरूपाच्या कर्मामुळे त्या व्यक्तीला या जन्मात त्याची फळे भोगावी लागली असून माझ्या वडिलांना मारण्याचे केवळ निमित्त घडले असावे, असा युक्तिवाद याही प्रकरणात एखाद्याला करता येईल. पण पूर्वजन्मातील कोणत्या तीव्र वाईट स्वरूपाच्या कर्मामुळे या जन्मात

त्याची फळे त्यांना भोगावी लागली हे माहित होत नसल्यामुळे ती त्यांच्या कर्माची अज्ञानमूलक उपपत्ती ठरते व ती ज्ञात असलेल्या कर्माच्या, म्हणजे ज्ञानमूलक उपपत्तीच्या, तुलनेने दुर्बळ ठरते, हेच उत्तर याही प्रकरणात देता येईल.

## कर्मसिद्धांत पुनर्जन्माशी निगडीत

मानवी जीवनातील विषमतेची उपपत्ती कर्मसिद्धांताच्याशिवाय अन्य कशानेही देता येत नसल्यामुळे कर्मसिद्धांत व्यावहारिक पातळीवर शास्त्रीय दृष्ट्या खरा म्हणून स्वीकारावा लागतो. माणसामाणसातील शारीरिक (भौतिक) विषमतेची( भिन्नतेची) उपपत्ति भौतिक विज्ञानावर आधारलेले जनुकशास्त्र(genetics) देऊ शकत असले तरी जनुकीय भिन्नता( विषमता) मुळात कशी निर्माण झाली हे ते शास्त्र सांगू शकत नाही. कारण जनुक मुळात कसे निर्माण झाले हे त्याला सांगता येत नाही. जनुकीय उत्परिवर्तन( mutation) किंवा बदल हा अपघात(accident) आहे म्हणजे ( मूळ जनुक निर्मिती प्रमाणे) ती आंधळी ( भौतिक) प्रक्रिया आहे, एवढेच ते शास्त्र सांगते.[2]* पण ‘ अपघात’ ही बहुतेक संकल्पना आपले अज्ञान झाकण्याचे एक साधन मात्र आहे. ही उपपत्ती (explanation) नव्हे. तात्पर्य, भौतिक विज्ञानावर आधारलेल्या जीवशास्त्राला मुळात माणसातील (व सर्व जीवजगतातील) विषमता( भिन्नता) कशी निर्माण व उत्क्रांत झाली, हे सांगता येत नाही. कर्म सिद्धांत ते सांगू शकते. आणि कर्म भौतिक विज्ञानाची संकल्पना नाही. भौतिक विज्ञान कर्माकडे केवळ कृती किंवा क्रिया म्हणून भौतिक दृष्टिकोनातून पाहते. म्हणजे धर्माच्या बाह्यांगाचाच विचार करते. जसे झाडाचे फळ पिकून खाली पडणे किंवा एखादी उल्का आकाशातून पडणे. पण कर्माचे स्वरूप केवळ भौतिक नाही. त्याचा केवळ बाह्यांगाने

---

[2] *“ Various mutations have been identified… We say that these( mutation) events are accidental, due to chance” Chance and necessity - Jacques Monod, 1983,Pp.109-10 ( भिन्नता निर्माण करणाऱ्या अनेक उत्परिवर्तनांचा ठावठिकाणा सापडला आहे… या ( उत्परिवर्तनांच्या) घटना अपघाताने, योगायोगाने घडतात असे आमचे म्हणणे आहे.)

विचार करून चालणार नाही. त्याच्या अंतरंगाचा विचार केला पाहिजे; आणि कर्माचे अंतरंग हेतू किंवा इच्छा( काम) हे आहे. म्हणजे चेतन वा आध्यात्मिक स्वरूपाचे आहे. भौतिक, यांत्रिक किंवा आंधळे नाही. आणि ते भौतिक, यांत्रिक वा आंधळे नसल्याचे कारण ते ईश्वराच्या विश्वनिर्मितीच्या मूळ कर्माचे प्रतिबिंब आहे. मूळ धर्म विश्वनिर्मिती असून**[3] (भूतभावोद्भवकरः विसर्गःकर्मसंज्ञितः।गीता ८.३) ती विश्वनिर्मिती ती ईश्वराच्या 'कामा' तून , इच्छेतून झालेली आहे.(कामस्तग्रे समवर्तताधि, मनसोरेतः यदासित। ऋ.१०.१२९.४;स अकामयत बहुस्यां प्रजायेयेति। तै.उप. २.६ ) ईश्वराच्या ' काम' ( इच्छा) रूपी मनाच्या रेतातून (बीजातून) (मनसो रेतः) विश्व निर्माण झाले आणि ते उत्पत्ती स्थिती लय अशा ब्रह्म चक्रातून- संसार चक्रातून- फिरत आहे, ते मूळ ईश्वरीय कर्मामुळे(दैवस्यैव महिमातु लोके येनेदं भ्राम्यते ब्रह्मचक्रम् ।श्वे.उप.६.१) आणि ईश्वराचे प्रतिरूप( प्रतिबिंब) असलेला मानव काम( इच्छा) रुपी मनाच्या रेतातून (बीजातून) तेच संसारचक्र आपल्या कर्माने फिरवत आहे. (तेनेशितं कर्म विवर्तते ।श्वे.उप. ६.२) कारण कर्माशिवाय संसारचक्र फिरणे शक्य नाही. अशा रितीने कर्म व पुनर्जन्म( संसारचक्र) परस्पराशी निगडीत आहेत. मनुष्य ('कामा' तून, इच्छेतून) कर्म करीत राहतो आणि त्या कर्माचे फळ भोगण्यासाठी पुन्हा पुन्हा जन्म घेत राहतो. (दोन जन्माच्या मधल्या काळात कारण देहाने स्वर्गात विश्रांती घेतो किंवा वासना बद्ध असेल तर वासना देहाने पृथ्वीवर भटकत राहतो. मात्र खून, अपघात, इ. मुळे मेला असेल तर लगेच जन्म घेतो) अशा रीतीने मानवाचे संसारचक्र रुपी पुनर्जन्माचे रहाटगाडगे कर्मामुळे सतत फिरत राहिले आहे. जडवादी भौतविज्ञानवाद्यांना व जीवशास्त्रज्ञ यांना म्हणजेच डार्विनच्या उत्क्रांतिवाद्यांना मरणोत्तर मानवाचे( मृतात्मा स्वरूपातील) अस्तित्वच मान्य नसल्यामुळे त्यांच्या दृष्टीने पुनर्जन्माचा प्रश्न निर्माण होत नाही. त्या वादाच्या दृष्टीने ही एक भाकडकथा ठरते. पण मृतात्म्यास असे वास्तव जसे अनुभव प्रमाणावर सिद्ध होते, तसेच पुनर्जन्माचे वास्तवही अनुभव प्रमाणावर सिद्ध होते; आणि अनुभव प्रमाणावर सिद्ध होणारे वास्तव( अनुभव निष्ट वास्तव) हे वस्तुनिष्ठ वास्तवच असल्यामुळे पुनर्जन्माचे अनुभवनिष्ठ वास्तव हेही वस्तूनिष्ठ वास्तवच

---

[3] ** अर्थात विश्वनिर्मितीचे मूळ कर्म ईश्वराच्या मायेमुळे ( प्रकृतीमुळे) निर्माण झाले आहे.( प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः। गीता ९.८)

(objectively real) ठरते. पुनर्जन्माचा अनुभव मात्र स्मृती रूपात म्हणजे वैयक्तिक स्वरूपाचा असतो. तथापि पुनर्जन्माच्या स्मृति सत्यापनाच्या कसोटीवर सत्य सिद्ध होतात. अर्थात तशा त्या सिद्ध झाल्या तरच पुनर्जन्माचा अनुभव वस्तुनिष्ठ आहे असे म्हणता येते; आणि मग पुनर्जन्माच्या स्मृतींना, मृतात्मा व इतर अतींद्रिय वास्तव घटनांप्रमाणे अनुभव प्रमाणाचा- म्हणजेच अतींद्रिय प्रत्यक्ष प्रमाणाचा- दर्जा प्राप्त होतो व त्या प्रमाणावर पुनर्जन्माचे वास्तव शास्त्रीय सत्य म्हणून सिद्ध होते. व वैज्ञानिक रित्या स्वीकारार्ह ठरते. आणि प्रत्यक्षात या प्रमाणावर पुनर्जन्माचे शास्त्रीय सत्य आयन स्टिव्हन्सन प्रभृती शास्त्रज्ञांनी भारतासकट जगातील अनेक देशातील हजारो पुनर्जन्म प्रकरणांचे संशोधन करून प्रस्थापित केले आहे व ते शास्त्रीय जगात विश्व स्वीकारार्ह ठरले आहे,( मात्र विज्ञानाच्या मुख्य प्रवाहातील प्रमुख शास्त्रज्ञ व जीवशास्त्रज्ञ पुनर्जन्माच्या या शास्त्रीय सत्याविषयी मौन पाळून आहेत!) ( अशा काही पुनर्जन्म प्रकरणांची माहिती मी माझ्या इतर ग्रंथात दिली आहे) डार्विनच्या उत्क्रांतीवादाच्या विरुद्ध अतींद्रिय प्रमाणाविषयीचे स्वतःचे अनुभव सांगण्यासाठी हा लेखन प्रपंच मी केला आहे खरा. पण इतर अतिंद्रिय घटनांचा अनुभव घेता आला तरी जसा कर्मसिद्धांत याविषयीचा अनुभव मला घेता आला नाही, तसेच पुनर्जन्म विषयीचा अनुभवही मला घेता आलेला नाही. त्यामुळे तो अनुभव मला येथे इतरांचा द्यावा लागत आहे. तो सत्यापनाच्या कसोटीवर तपासून सत्य असल्याचा आढळून आलेला असल्यामुळे तो येथे देत आहे. एका व्यक्तीला मात्र ते सलग आठ जन्म आठवत असल्याचा हा असामान्य अनुभव असून त्यातील काही जन्मांचे सत्यापन(verification) झाले आहे. पण त्या जन्मांचे सत्यापन झालेले नाही जन्मांचा, सत्यापन झालेल्या जन्माची संबंध आढळून आलेला असल्यामुळे आठवत असलेल्या आठही जन्मांची सलग माहिती देण्याचे ठरवले आहे. कारण तशा माहिती शिवाय त्या सर्व आठही जन्मांचा अर्थबोध होणार नाही पण तत्पूर्वी पुनर्जन्म खरा असल्याबद्दल ते वैज्ञानिक पुरावे काय आहेत हे आपल्याला पाहिले पाहिजे.(क्रमशः)

---